**विद्यार्थी /पालक व शाळा /संस्था यांच्या तक्रारींचे निवारण करण्यासाठी तक्रार निवारण समिती नियुक्त करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: तक्रार - २०२०/प्र.क्र.५०/एसडी-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: २६ फेब्रुवारी, २०२०.

<u>वाचा</u>:- १. शासन निर्णय क्र. : तक्रार २०१९/प्र.क्र.७५/टीएनटी-४,दिनांक २९/०८/२०१९.
२.शासन शुध्दीपत्रक क्र. : तक्रार २०१९/प्र.क्र.७५/टीएनटी-४,दिनांक ०१/१०/२०१९.
३.शिक्षण आयुक्त कार्यालयाचे परिपत्रक समक्रमांक ५९३५,दिनांक ११/१०/२०१९ व समक्रमांक ६०११,दिनांक १६/१०/२०१९.

**<u>प्रस्तावना:</u>**

महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) विनियम अधिनियम १९७७ मधील कलम ८ अन्वये शाळा न्यायाधिकरणाची तरतुद करण्यात आली आहे. शाळा न्यायाधिकरणाच्या अधिकारक्षेत्रात न येणाऱ्या तक्रारींवर कार्यवाही करण्यासाठी सद्य:स्थितीत कोणतीही औपचारिक व्यवस्था अस्तित्वात नाही. खाजगी अनुदानित/अंशत: अनुदानित शाळांतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या तक्रारींवर कार्यवाही करण्याची व्यवस्था नसल्याने न्यायालयीन प्रकरणांची संख्या वाढत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले. या अनुषंगाने दाखल याचिकांबाबत मा.न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार उच्च व तंत्र शिक्षण विभागाने दिनाक १८/१२/२०१८ च्या शासन निर्णयान्वये शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी व अधिकारी यांच्या तक्रारींवर कार्यवाही करण्यासाठी तक्रार निवारण समिती गठीत केली आहे. याच धर्तीवर वरील संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये व २ च्या शुध्दीपत्रकान्वये मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित/ विनाअनुदानित/अंशत: अनुदानित शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या तक्रारींवर कार्यवाही करण्यासाठी तक्रार निवारण समिती गठीत करण्यात आली आहे. याबाबत शिक्षण आयुक्तांनी संदर्भ क्र. ३ च्या परिपत्रकान्वये आनुषंगिक सूचना निर्गमित केल्या आहेत.

शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या तक्रारींबाबत वरीलप्रमाणे तक्रार निवारण समिती कार्यरत आहे. तरीही विद्यार्थी/पालक व शाळा/संस्था यांचेकडून दिवसेंदिवस तक्रारींचे प्रमाण वाढत आहे ही बाब लक्षात घेवून राज्यातील सर्व शाळांमध्ये विद्यार्थी / पालक, शाळा/संस्था यांच्या तक्रारींचे निवारण करण्याकरिता तक्रार निवारण समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**शासन निर्णय:-**

राज्यातील सर्व शाळांमध्ये विद्यार्थी / पालक, शाळा/संस्था यांच्या तक्रारींचे निवारण करण्याकरिता खालीलप्रमाणे तक्रार निवारण समिती गठीत करण्यात येत आहे :-

| अ . क्र . | समितीमधील पदनाम | अधिकाऱ्याचे पदनाम |
|---|---|---|
| १. | अध्यक्ष | विभागीय अध्यक्ष , महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ , संबंधित विभाग |
| २. | सदस्य | विभागीय शिक्षण उपसंचालक , संबंधित विभाग |
| ३. | सदस्य | शिक्षण उपनिरीक्षक / शास्त्र सल्लागार संबंधित विभाग |
| ४. | सदस्य सचिव | सहाय्यक संचालक,संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक कार्यालय |

तक्रार करणाऱ्यांचे प्रमाण वाढल्याने क्षेत्रिय स्तरावरुन विहित कालमर्यादेत आवश्यक कार्यवाही होवू शकत नाही. त्यामुळे खालील “अ, ब व क” मध्ये नमूद केलेल्या तक्रारींवर विभाग स्तरावर निराकारण होणे आवश्यक आहे . त्यादृष्टीने वरीलप्रमाणे तक्रार निवारण समिती गठीत करण्यात आली आहे.

**(अ) विद्यार्थी**

१. बालकांचा मोफत व सक्तीचा शिक्षणाचा अधिकार अधिनियम २००९ मधील तरतुदींच्या अनुषंगाने तक्रारी उदा . सोडत पध्दतीने शाळा प्रवेश , गणवेष , पुस्तके इ.
२. फी वाढीसंदर्भातील तक्रारी
३. खाजगी शाळेतील शाळा प्रवेशाबाबतच्या तक्रारी
४. खाजगी शाळांमध्ये गणवेष, पुस्तके सक्तीने खरेदी करावयास लावण्याबाबतच्या तक्रारी
५. शाळांकडून आयोजित केल्या जाणाऱ्या सहलीबाबतच्या तक्रारी
६. लैंगिक व मानसिक शोषणाबाबतच्या तक्रारी
७. अनुत्तीर्ण केल्याबाबतच्या तक्रारी
८. जातीभेद भावनेतून अन्यायाबाबतच्या तक्रारी
९. शाळेतून नाव कमी करणे, नावात बदल, जन्मतारीख नोंद, आडनाव, जात, पोटजात बदल, शाळा सोडल्याचा दाखला इ . तक्रारी
१०. शाळा तासिका, विषयानुसार अध्यापनाबाबत तक्रारी
११. उपस्थिती, शारीरिक शिक्षा इ . बाबतच्या तक्रारी
१२. शैक्षणिक साहित्य, शैक्षणिक गुणवत्ताबाबतच्या तक्रारी
१३. गुणपत्रिकेतील गुणांबाबत तक्रारी

**ब) संस्था**

संस्थांतर्गत वाद, संस्था मुख्याध्यापक, संस्था - शिक्षक वाद यामुळे उद्भवणाऱ्या सर्व तक्रारी

**क) शाळा**

१. नैसर्गिक वाढीने शासनास सादर करावयाचे तुकडी मान्यतेचे प्रस्ताव

२. शाळांना द्यावयाच्या प्रथम मान्यताबाबतच्या तक्रारी

३. संच मान्यताच्या अनुषंगाने तक्रारी

४. अनधिकृत शाळांवर कारवाईबाबतच्या तक्रारी

५. वैयक्तिक मान्यतेबाबत शाळांकडून प्राप्त तक्रारी

६. प्रशासक नियुक्ती, शाळा स्थलांतर, हस्तांतरण यासंदर्भातील तक्रारी

७. पदांबाबत शाळेकडून प्राप्त तक्रारी

८. शाळांसंबंधित सर्व प्रकारची नाहरकत प्रमाणपत्र

सदर समितीच्या कार्यकक्षेत संबंधित प्रकरणांच्या तक्रारीचे निराकारण तात्काळ होणेसाठी लोकशाही दिनाचे धर्तीवर शिक्षण दिनाचे प्रत्येक महिन्याच्या पहिल्या सोमवारी वरिष्ठ कार्यालयातील वरिष्ठ अधिकारी यांचे अध्यक्षतेखाली आयोजन करावे. जेणेकरुन तक्रारी तात्काळ निकाली काढून न्यायप्रविष्ट प्रकरणांची संख्या कमी होण्यास निश्चित मदत होईल. वरील “अ ते क” मधील ज्या प्रस्तावांवर शासन स्तरावरुन निर्देश /मान्यता आवश्यक आहे, ते प्रस्ताव विहित मार्गाने शासनास सादर केले जावेत .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२६१५५६४१६४२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d475 5ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2020.02.26 15:59:35 +05'30'

**( राजेंद्र पवार )**

**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव,

२) शिक्षण आयुक्त,महाराष्ट्र राज्य,पुणे.

३) शिक्षण संचालक,(माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य,पुणे.

४) शिक्षण संचालक (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य,पुणे.

५) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.

६) सर्व शिक्षणाधिकारी /शिक्षण निरिक्षक.

७) अपर मुख्य सचिव,शालेय शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक.

८) निवड नस्ती/एसडी-४.